**आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त शासकीय आश्रमशाळा/ वसतीगृहामधील रोजंदारी/ तासिका तत्वावरील कर्मचाऱ्यांना शासन सेवेत नियमित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग,**
**शासन निर्णय No.: MTD-३६०३७/३३/२०२४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २४ जून, २०२४.

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त विभागीय स्तरावर अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, ठाणे, नागपूर व अमरावती अशी एकूण चार विभागीय कार्यालये असून एकुण ३० प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालये कार्यरत आहेत. आदिवासी विकास विभागाअतंर्गत ४९९ शासकीय आश्रमशाळा कार्यरत आहेत.

आदिवासी विकास विभागांतर्गतच्या कार्यरत आश्रमशाळा या अत्यंत दुर्गम व डोंगराळ भागात आहेत. दुर्गम, अतिदुर्गम व डोंगराळ भागात सुरु असलेल्या आदिवासी विकास विभागाच्या आश्रमशाळांमधील पदे रिक्त राहिल्यामुळे अशा क्षेत्रातील आदिवासी आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांना शैक्षणिक सुविधा पुरवण्यामध्ये विभागाला मोठया प्रमाणावर अडचणींना तोंड द्यावे लागते. तसेच सदर आश्रमशाळांमधील माध्यमिक व उच्च माध्यमिक वर्गासाठी आवश्यकतेप्रमाणे विषयनिहाय तज्ञ शिक्षक आवश्यक असल्याने उपलब्ध शिक्षकांकडून शिकविण्याचे काम करुन घेणे शक्य होत नाही. त्यामुळे शिक्षणाचे व विद्यार्थ्यांना सुविधा पुरविण्याचे काम नियमितपणे सुरु राहण्यासाठी व अशा आश्रमशाळांमधील रिक्त पदांमुळे विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होऊ नये, म्हणून विषयनिहाय आवश्यकतेप्रमाणे शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची तासिका तत्वावर/मानधनावर नियुक्ती संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास/प्रकल्प अधिकारी/मुख्याध्यापक स्तरावर अत्यंत तात्पुरत्या स्वरुपात करण्यात आलेली होती.

आजमितीस आदिवासी विकास विभागामध्ये आयुक्त आदिवासी विकास यांच्या अंतर्गत ४ अपर आयुक्तांच्या कार्यक्षेत्रात रोजंदारी/तासिका तत्वावरील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी मागील १० ते १५ वर्षापासून कार्यरत आहेत. अशा कर्मचाऱ्यांपैकी काही कर्मचाऱ्यांनी मा. उच्च न्यायालयांमध्ये याचिका दाखल केलेल्या होत्या. मा.न्यायालयाने रिट याचिका क्र.७३५१/२०१२, रिट याचिका क्र.२१९४/२०१३, रिट याचिका क्र.२१९६/२०१३, रिट याचिका क्र.५८६७/२०१५ प्रकरणी दि.३१.१०.२०१८ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयात १० वर्षापेक्षा जास्त कालावधी झालेल्या याचिकाकर्त्यांच्या सेवा नियमित करण्याबाबतचे आदेश दिले आहेत. मा.सर्वोच्च न्यायालयानेही मा.उच्च न्यायालयाचे आदेश कायम ठेवले आहेत. ही बाब विचारात घेवून रोजंदारी तत्वावरील कर्मचाऱ्यांना नियमित करण्याबाबत दाखल रिट याचिकांमधील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांपैकी मा. उच्च न्यायालयाने ठरवून दिलेले निकष पूर्ण करणाऱ्या शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शासन निर्णय दि.१२.०४.२०२२ व दि.०६.०२.२०२३ नुसार शासकीय सेवेत नियमित करण्यात आले आहे. त्याच धर्तीवर आदिवासी विकास विभागांतर्गत शासकीय आश्रमशाळेतील शिक्षक व शिक्षकेतर पदावर रोजंदारी तत्वावर कार्यरत असलेल्या

विविध मा.उच्च न्यायालयात याचिका दाखल केली असून, त्याप्रकरणी देखील मा. न्यायालयाने दि.३१.१०.२०१८ रोजीच्या न्यायनिर्णयानुसार कार्यवाही करण्याचा निर्णय दिलेला आहे. त्यानुसार मा.उच्च न्यायालयाने दि.३१.१०.२०१८ रोजीच्या निर्णयात नमूद बाबींची पूर्तता करणाऱ्या कर्मचाऱ्यांना शासन सेवेत नियमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त शासकीय आश्रमशाळांमध्ये रोजंदारी/तासिका तत्वावरील कार्यरत कर्मचाऱ्यांना मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयांनुसार शासन सेवेत नियमित करण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

१) आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त शासकीय आश्रमशाळेतील शिक्षक व शिक्षकेतर पदावर रोजंदारी / तासिका तत्वावर कार्यरत असलेले, मा.उच्च न्यायालयात याचिका दाखल केली आहे, असे याचिकाकर्ते कर्मचारी, मा. न्यायालयाच्या निर्णयात नमूद बाबींची पूर्तता करणाऱ्या प्रपत्र - अ मधील ४ कर्मचाऱ्यांना सदर प्रपत्रातील रकाना ८ मध्ये नमूद केलेल्या दिनांकापासून शासन सेवेत नियमित करण्यात येत आहे.

२) संबंधित नियुक्ती प्राधिकारी (अपर आयुक्त/ प्रकल्प अधिकारी) यांनी, संबंधित कर्मचाऱ्यांच्या सेवा कालावधी व शैक्षणिक अर्हता यांची तपासणी करुन तसेच बिंदु नामावलीनुसार रिक्त पदे विचारात घेऊन नंतरच नियमितीकरणाचे आदेश पारित करावेत. यानुषंगाने शासनाच्या आरक्षणाबाबतच्या / बिंदूनामावली बाबतच्या शासन निर्णयातील तरतूदींचे पालन करण्यात यावे. शिक्षक कर्मचाऱ्यांची बिंदूनामावली अपर आयुक्त स्तरावर तसेच शिक्षकेतर वर्ग-४ कर्मचाऱ्यांची बिंदूनामावली प्रकल्प अधिकारी स्तरावर ठेवण्यात येते. वरीलप्रमाणे नियमितीकरणानंतर संबंधित कर्मचाऱ्यांना संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्याने त्या त्या प्रवर्गाच्या बिंदूंवर सामावून घ्यावे. सदर प्रवर्गाचा रिक्त बिंदू उपलब्ध नसल्यास त्यांना खुल्या प्रवर्गाच्या रिक्त बिंदूवर तात्पुरत्या स्वरुपात समायोजित करण्यात यावे व भविष्यात ज्या उमेदवाराचा स्वत:च्या प्रवर्गाचा बिंदू रिक्त होईल, त्यावेळी त्यांना त्या रिक्त बिंदूंवर दर्शवावे.

३) आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयांचा सुधारीत आकृतिबंध दि.१६.११.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये अंतिम करण्यात आला आहे. विभागाच्या सुधारीत आकृतीबंधानुसार गट-ड संवर्गातील काही संवर्ग मृत घोषित करण्यात आले आहेत. तथापि गट-ड संवर्गातील रोजंदारी तत्वावर असलेले कर्मचारी हे आकृतीबंध निश्चित होण्यापूर्वीपासून कार्यरत असल्याने, त्यांच्या सेवा सदर मृत संवर्गात नियमित करण्यात याव्यात. सदर कर्मचाऱ्यांच्या सेवा नियमित केल्यानंतर अशा कर्मचाऱ्यांच्या संख्येइतकी पदे अधिसंख्य समजण्यात यावीत. अधिसंख्य ठरविलेल्या पदावरील व्यक्तीच्या सेवानिवृत्ती/राजीनामा/मृत्यु इ. कारणामुळे ते रिक्त झाल्यानंतर सदर अधिसंख्य पदे रिक्त होईल.

४) उपरोक्त १) मधील नमूद कर्मचाऱ्यांच्याबाबत निश्चित करण्यात आलेल्या नियमितीकरणाच्या दिनांकापासूनची सेवा सर्व प्रत्यक्ष लाभासाठी ग्राह्य मानण्यात येईल. त्यापूर्वीच्या सेवेचे कोणतेही लाभ संबंधित कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय होणार नाहीत. उदा. संबंधित कर्मचाऱ्यांची सेवाज्येष्ठता त्यांच्या नियमितीकरणाच्या दिनांकापासून लागू करण्यात येईल. अशा प्रकारे सेवा नियमित करण्यात आलेल्या रोजंदारी/तासिका तत्वावरील कर्मचाऱ्यांची एकाच तारखेस नियमितीकरण करण्यात आले असल्यास त्यांची

अंतर्गत सेवाज्येष्ठता त्यांच्या रोजंदारी/तासिका तत्वावरील नियुक्तीच्या ज्येष्ठतेप्रमाणे निश्चित करण्यात यावी. तसेच सदरहू कर्मचाऱ्यांना नियमित वेतनश्रेणी अनुज्ञेय करतांना ती संबंधित पदाच्या वेतनश्रेणीच्या किमान टप्प्यावर निश्चित करण्यात यावी.

५) मा.सर्वोच्च न्यायालयाच्या दि.२०.०८.२०२० च्या आदेशानुसार नियमितीकरण करण्यात येणाऱ्या प्राथमिक शिक्षक कर्मचाऱ्यांनी त्यांचे नियमितीकरण केल्यानंतर सदर पदावर रुजू झाल्याच्या दिनांकापासून पाच वर्षाच्या कालावधीत शिक्षक पात्रता परीक्षा (TET) उत्तीर्ण होणे अनिवार्य आहे, अन्यथा शासनाकडून त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०६२४१८०४२०६९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PAWANKUMAR BAPURAO BANDGAR

Digitally signed by PAWANKUMAR BAPURAO BANDGAR
DN: CN = PAWANKUMAR BAPURAO BANDGAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2024.06.24 18:18:44 +05'30'

**( पवनकुमार बंडगर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत :- प्रपत्र-अ**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल याचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव.
६. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. मुख्य सचिव, अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई
८. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास याचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
१०. आयुक्त आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
११. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/ नाशिक / अमरावती/ नागपुर.
१२. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र २. मुंबई नागपूर
१५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१६. सर्व उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. निवड नस्ती (कार्यासन-१५)

प्रपत्र अ

मा.उच्च न्यायालयामध्ये याचिका दाखल केलेले व नियमित करण्यात येणारे रोजंदारी तत्वावरील कर्मचारी

| अ. क्र. | याचिका क्रमांक | रोजंदारी/तासिका तत्वावरील कर्मचा-यांची नावे | जातप्रवर्ग | शैक्षणिक अर्हता | याचिका दाखल केल्याचा दिनांक | निकाल लागल्याचा दिनांक | नियमित करावयाचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | ३१९५/२०२३ | श्री. नितिन तुकाराम गायकवाड | वि.जा.(अ) | M.A.Bed | २८.०२.२०२३ | २१.०३.२०२३ | २८.०२.२०२३ |
| २ | ३१९५/२०२३ | श्रीम. सुप्रिया प्रभाकर हत्ते | भ.ज.ब | B.A.Bed | २८.०२.२०२३ | २१.०३.२०२३ | २८.०२.२०२३ |
| ३ | ३५०३/२०२३ | श्री.गणेश जगन्नाथ राहणे | इ.मा.व | B.A.Bed | ०७.०६.२०२३ | ०८.०६.२०२३ | ०७.०६.२०२३ |
| ४ | २३७१/२०२१ | श्री. होरीलाल दुधराम कांबळे | भ.ज.ब | M.A.Bed | ३१.१२.२०२० | ०५.०९.२०२३ | ३१.१२.२०२० |

PAWANKUMAR BAPURAO BANDGAR

Digitally signed by PAWANKUMAR BAPURAO BANDGAR
DN: CN = PAWANKUMAR BAPURAO BANDGAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2024.06.24 18:19:02 +05'30'

(पवनकुमार बंडगर)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन